


राज्य मराठी विकास संस्था
(महाराष्ट्रशासन पुरस्कृत)
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय,
३, महापालिका मार्ग,
धोबीतलीव, मुंबई – ४००००१
रजि नं. एफ १६०९४ (मुंबई)
दूरध्वनी : २२६५३९६६ / फॅक्स : २२६३१३२५
Email rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क्र./ २०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे.

ह्या प्रकल्पांतर्गत उपलब्ध होणारे ग्रंथ व नियतकालिके प्रतिमुद्राधिकार अधिनियमाची मुदत उलटलेले असल्याने सार्वजनिक स्वरूपात उपलब्ध आहेत. ही सामग्री विविध ग्रंथालयांनी जतन करून ठेवल्यामुळेच आज आपल्याला उपलब्ध होत आहे.

सदर पुस्तके अथवा नियतकालिके जशी उपलब्ध होत जातील तसे त्यांचे संगणकीकरण करून जनतेला ती उपलब्ध करून देण्यात येतील. ह्या ग्रंथांच्या/ नियतकालिकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना आपण खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

०१ सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती ह्या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.

०२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.

०३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्थेची मुद्रा आपणास काढता येणार नाही.

०४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी ह्या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून ह्या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. ह्यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था ह्यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

## अनुक्रमणिका

## विषयक्रमः

बखरी.



मराठी कविता.



संस्कृत कविता.

ही फौज पुढें आली. मोठी मारामारी जाहली. तांत्राकडील लोक बहुत मारिले. आणि सावकारांचे वाडे काबीज करून सोनें, रुपें, मोतीं, पोंवळें, माणीक, हिरे, पाच, गोमेदराज, वैडुर्य, असे नवरत्नें नाणें मोहरा, पुतळ्या, इभ्राम्या, सतराम्या, असेफ्या, होन, नाणें नानाजातीचें इतक्या जिनसाच्या धोंकटिया भरल्या. कापड भांडें तांब्याचे वरकड हान [ अन्य ? ] जिन्नस यास हात लाविलाच नाहीं. असें शहर दोन दिवस अहोरात्र लुटिलें. उत्तम घोडे जितके युद्धांत व सावकाराच्या घरांत सांपडले तितके घेतले. आणि राजियांनीं विचार केला कीं, लौकर निघून जावें. असें करून कुल लष्करांतून निमे घोडी भांडावयास लष्करी ठेविलीं. निमे घोडियांवरीं धोंगटिया मालाच्या घातल्या. पाईंच्या लोकांस हमेण्यैं करून त्यांजवळ दिधल्या. अशी मुस्तेदी करून वोझीं घेऊन निघाले. सुरतेचा कोट घेतला नाहीं. अवकाश थोडा ह्मणून शहर मारून चौलिलें. ही खबर मोंगलांचे सुभेदार वीस उंबराव व मोहबत खान, व दाऊदखान असे सात गांवची दरड करून बराबर हजार स्वार एक एक सुभ्याबराबर चालून आले, त्यानीं राजियास गांठलें. गनीम आला ऐशी खबर कळली. राजा खांसा घोड्यावर बैसून बख्तर घुंगी घालून, हातीं पट्टे चढवून, मालमत्ता घोडीं, पाईंचे लोक पुढें रवाना करून आपण दहा हजार स्वारानिशीं सडेसडे राऊत उभे राहिले. वणी दिंडोरी ह्मणवून शहर आहे ते जागां उभे राहून सुभ्याचे लोक आले त्यांशीं घोरांदर युद्ध केलें. मोहबत खान व दाऊत खान यांनीं युद्ध केलें. राजियांनीं आपली फौज पुढें करून पाठीवर आपण खांसा राहून झगडा दिधला. प्रतापराव सरनोबत व व्यंकोजी दत्तो व आनंदराव वरकड सरदार पुढें होऊन मोठी कत्तल केली. आणि मोंगल मारून मुरदे पाडिले. दोन प्रहर युद्ध झालें. मराठे यांणीं शर्त केली. तीन हजार मोंगल मारिले. तीन चार हजार घोडे पाडाव केले. दोन वजीर मोंगलाई सांपडले. असे फत्ते करून आले. तों पुढें उदाराम वजीर मोंगलांचा याचा लेक जगजीवन उदाराम[याची]बाईल

---

४९. इभ्राम्या, सतराम्या, असफ्या हीं नाना प्रकारचीं सुवर्णाचीं नाणीं निरनिराळ्या बादशहांचीं होत.

५०. हमेणी = लांब पिशवी.

५१. मुस्तेदी = तयारी.

५२. इंग्रजाच्या वखारीबद्दल येथें उल्लेख नाहीं. त्यांणीं या वेळीं आपला बचाव केला व कांहीं सावकारांचेंही आपल्या कोटांत संरक्षण केलें. कदाचित् शिवाजीस तितकी फुरसुद सांपडली नसेल असें ही ह्मणतां येईल.

५३. बखतर = चर्म, ढाल (?) घुगी = शिरस्त्राण.

रायबागीणें असे व सरदार पांच हजार उंदीर [ ? ] आले. त्यास मारून चालविले. रायबागीण कोंडली. तिणें दांतीं तृण धरून लेंक राजियाची ह्मणून बोलून कौल घेतला. मग तीस कौल घेतला. मग तीस कौल देऊन अनीत करून सोडली आणि माघारे राजे राजगडास आले.

मालमत्ता सुरतेची आकार करितां सर्व बिशांत पांच कोर्डे होनाची आणली. चार हजार घोडीं आणलीं, तीं पागा केली. पागेस खूण चौकटीचा डाग घोड्याचे उंअवेकडे देऊन अशी ओळखण करून पुढें ज्या ज्या मुलखांत अदलशाही निजामशाही गड होते तितके घेतले. कित्येक डोंगर बांके जोगेत होते ते गड वसविले. जागोजागां गांवावरि मुलखांत नूतन गडवसविले. गडा करितां मुलूख जप्त होता. असे समजून गड बांधिले. व कोंकणांत कल्याण भिवंडी राजापूर पावेतों देश काबीज केला. काबीज करितां जागां जागांपुढें पाळेगार होते व देशमुख होते, त्यामध्यें जे युद्धास आले त्यांस मारून गर्दीस मेळविलें. आणि ज्यानीं कौल घेतला, त्यास यथायोग्य चालवून रक्षिलें. रेवदंडा राजापुरी दर्यामध्यें किल्ला निजामशाही आहे तेथें हबशी किल्लेदार जागियाचा खावंदच. याचीं पाणियांतील जहाजें गुरांबा चाळीस पन्नास आरमार त्यानें करून मुलूख मारून पैदा करून जागा जतन आहे. त्याचे लोकांनीं राजियाचे देशास उपद्रव मांडिला. मग राजियानें बाजी पासलकर यास लष्कर मावळा हजार दोन हजार [दिला] तैसेच जहाजें पाणियांतील झालीं. समुद्रास पालाण राजियांनीं घातलें. हा एक हात सजला. राजापुरी एक पाणियांत उरली या करितां आद्यापि निजामशहाचें नांव चालतें तें स्थळ हस्तगत करावें ह्मणून राजियानीं जागां जागां डोंगर पाहून गड वसविले कीं येणें करोन दर्या जेर आहे, आणि पाणियांतील राजे जेर होतील. असें जाणून कित्येक पाणियांतील डोंगर बांधून दर्या मध्यें गड वसविले. पाणियांतील ह्मणजे केवळ जंजिरे असें करून गड जहाजें मेळवून दर्यास पालाण राजियानें घातलें. जों वर पाणियांतील गड असतील तोंवर आपले नांव चालेल, असा विचार करून अगणित गड जंजिरे जमीनीवर व पाणियांत वसविले. असें कर्म केलें.

---

५४. रायबागिण ही माहूरची देशमुखीण. हिचा भ्रतार एका लढाईंत पडला असतां ही पुढें होऊन आपल्या लोकांस धीर देऊन जय पावली ह्मणून तीस रायबागीण असा किताब बादशहानें दिला होता.

५५. "मोंगल येऊन उंदीरखिंडीस आले" पाठांतर.

५६. अनात=अनाथ (?)

५७. बिशात=संपत्ति, मालमिळकत.

५८. "साडेआठ कोट होनाची जागा आणिली" पाठांतर.

५९. "उजवे टिरीवर" पाठांतर.

६०. गुराबा=एक प्रकारचे तारूं.

त्याजवरि राजापुरीहून कायसांवत ह्मणोन पांच हजार फौजेनिशीं युद्धास आला. मोठे युद्ध होतां बहुत रणकंदल जालें. कायसांवत खासा व बाजी पालसकर महायोद्धा—याच्या मिशा दंडा एवढ्या यांस पीळ घालून वारे केशाच्या आधारे निंबे दोहींकडे दोन ठेवीत होता, असा शूरमर्द ठेविला—याशीं व त्याशीं खासा खाशी गांठ पडली. एकास एकांनीं पंचवीस जखमा करून ठार पडले. मग उभयतांकडील दळ आपले जागियास गेलें

इतकियांत राजियाचे बाप शहाजी महाराज बेंगरूळीं होते ते विजापुराकडे येत असतां एकाएकीं चित्रदुर्गांत विलाइतीमध्यें बोदेंगदरी[६१] गांवीं घोडियावरून पडून मृत्यु पावले. हें वर्तमान राजियास कळलें. बहुत शोक केला सर्वही विधान करून दानधर्म अपार केले. आणि बोलिले कीं, "मजसारख्या पुत्राचा पराक्रम महाराज पहाते तरि उत्तम होतें. आपण आपला पुरुषार्थ कोणास दाखवावा? मागें अफजुलखान मारिला व शास्ताखानास शास्ती केली. पराभवास पावविला. आणि मिरजा राजियाची भेट घेऊन दिल्लीस गेलों. पादशहाची भेट घेऊन मागती आपल्या राज्यास आलों. मागती कित्येक गड घेतले व शहरें मारिलीं आणि पागा शिलेदार लष्कर चाळीस हजार केलें. असें पराक्रमाचें वर्तमान ऐकून महाराज संतुष्ट झाले. सभाधान पत्रें आपणास वरचेवर येत होतीं. तैशींच अलंकार वस्त्रें पाठवीत होते. या उपरि त्या मागें आपणास कोणी आतां वडील नाहीं!" ह्मणून मोठा खेद केला. त्या उपरि मातुश्री अग्निप्रवेश करीत होती तिचे मांडीवर बैसोन गळां मिठी घालून आण घालून राहविली. आपला पुरुषार्थ पाहवयास कोणी नाहीं. तूं जाऊं नको. ह्मणून मोठा यत्न करून राजियांनीं व सर्व थोर थोर लोकांनीं राहविली. असें वर्तमान झालें.

पुढें राजियास राजपुरीचे शिदी घरांत जैसा उंदीर तैसा शत्रु, यास कैसें जेर करावें ह्मणून तजवीज[६२] पडली. तेव्हां रघुनाथ बल्लाळ सबनीस यांनीं आंगें अर्ज केला कीं, आपण शिद्दीवर स्वारी करितों. असे ह्मणून सात पांच हजार मावळे खकम पाईचे घेऊन राजपुरीवरि चालिले. त्यांनीं जाऊन राजपुरी पावेतो तळें घासाळें कुल देश मारून राजपुरी पावेतो सरदें[६३] दरिया किनारा मोकळा केला, शिद्दीच्या एक दोन फौजा आल्या त्या मारिल्या. तेव्हां राजपुरी कडून रघुनाथपंताशीं राज

---

६१. "बोदेगिरगांवीं" पा०
६२. तजवीज=विचार, काळजी.
६३. सरद = सीमा.



अनुक्रमणिका

कारण करून सल्ला केला. देश थोडा बहुत मागून, पुढें सज्जन मनुष्य पाठवून आण शफत देऊन, रघुनाथपंतास भेटीस नेलें. भेट जाहली, सत्याची बळकटी करून सख्य झालें. रघुनाथपंतास वस्त्रें घोडा दिधला. आपले देशास आले. पुढें काळानुसार रघुनाथपंत मृत्युपावले. त्या नंतर शिद्दीचे शैल तुटलें. यावरि हाबशियांनीं बदल खावून देशास उपद्रव करूं लागले. मग राजियानीं व्यंकाजी दत्तो फौजेनिशीं नामजाद रवाना केले. त्यांनीं जाऊन त्याचा मुलूख मारून तलफ[६४] केला. मग शिद्दीनें आपले जातीचे हापशी लष्कर घोडे स्वार व हशम नामजाद व्यंकाजी दत्तोवर रवाना केले. याशीं त्याशीं युद्ध जालें. तीनशें हावशी व्यंकाजी पंतीं मारिले. घोडे पाडाव केले. व्यंकाजी पंतीं कस्त[६५] फार केली. बारा जखमा व्यंकाजी पंतास लागल्या. असा चौकी[६६] बसवून आले. शिद्दीनें सल्याचें नातें लाविलें होतें. परंतु राजियानीं सल्ला केलाच नाहीं. त्याचे देशांत जागां जागां गड कोट नवेच बळावून राहिले. राजपुरी नजीक डोंगर बळाविला होता तो घेऊन गड बांधून कुल देश काबीज केला. ठाणीं ठेविलीं. मग त्याचा इलाज चालेना. पांच सात हजार हशम व सुभे ठेविले. असें केलें. मग राजपुरींत मुलूख नाहीं. दाणे कोठून यावे? त्यास पाणियांतील जाहजें होतीं. तेणें करून बरकड मुलूख मारून सामान आणून खाऊं लागले. त्यास राजियानीं जाहाजें पाणियांतील सजिलीं. गुराबा व तांडीं[६७] व तारवें गलबतें, शिबाडें, गुराबा, पगार अशीं नाना जातीचीं जहाजें करून दर्यासागर ह्मणोन मुसलमान सुभेदार व मायनाईक ह्मणोन भंडारी असे दोघे सुभेदार करून, दोनशें जहाजें एक सुभा, असे आरमार सजलें. त्यास व शिद्दीचे जाहाजास युद्ध होऊन शिद्दीचीं जहाजें पाडाव केलीं. युद्ध बहुत जाहलें. दर्यांत तरांडें फिरेना असें जालें. त्यावर हमेशा युद्ध करीत चालले. मग चोरून मारून हाबशी सामान नेत होता. राजियाचीं जहाजें जागांजागां बंदरें शहरें मोंगलाई व फिरंगी व वलंदेज, इंग्रज, किलाताव ऐशा सत्तावीस पातशाहा पाणियांत आहेत त्यांचीं शहरें बदनूर, सोंदें श्रीरंगपट्टण ऐशीं दर्या किनारे नाना शहरें मारून पोट भरीत चालले. जागांजागां युद्ध करीत माल मत्ता मेळवून आपले पोट भरून राजियास रसद द्रव्यें जिन्नस आणून देऊं लागले. ये रीतीनें सातशें जहाजें पाण्यांती-

---

६४. तलफ = जप्त.
६५. कस्त = मेहनत.
६६. चौका = जरब, धाक.
६७. तांडी विशेष.



अनुक्रमणिका

ल झालीं. समुद्रांमध्यें ही एक लष्कर झालें. हा एक बेत सजिला. पाण्यांतील एक राजपुरी निजामशाही उरली. याकारितां अद्याप निजामशहाचें नांव चालतें.

तें स्थळ जेर करावें म्हणोन व कोंकणांत कुडाळीं लखमसावंत देसाई ह्मणोन पुंड होता. बारा हजार हशमानिशीं राहत असे. कुडाळ ह्मणजे आदलशाही. त्याणे विजापुरास सांगून पाठविलें कीं फौज घोडा राऊत हशम मेळवून आपण राजियावरि चालोन जातों आणि कोंकण सोडवितों. ह्मणोन सांगोन पाठविलें. त्याजवरून विजापुरींहून खवासखान सरलष्कर, मोठा योद्धा, दाहा हजार स्वारांनिशीं कुडाळास आला. लखमसांवत बारा हजार हशमांनिशीं सामील होऊन कोंकण सोडवीत चालले. इतकियांत राजास खबर कळून लष्कर व हशम निवड करून नीट चालून त्याजवर घेतलें. खवासखानास विजापुराहून मदतीस बाजी घोरपडे, दीड हजार स्वार, येत होते. घाट उतरोन कोंकणांत राहिले. त्याजवर राजियांनीं लष्कर पाठवून छापा घालून, बाजी घोरपडे कुल भाऊबंद सहवर्तमान बुडविले.* बाराशें घोडीं पाडाव केलीं. मोठें युद्ध झालें. पुढें कुडाळावरि खवासखानावरि जावें, त्यासही या सारखे बुडवावें, तो त्यांनीं हें वर्तमान ऐकिलें. बाजी घोरपडे दीड हजार घोडे समवेत बुडविले. ही खबर ऐकून धास्त खाऊन घाटावर पळून गेला. नीट विजापुरास पावला. पुढें लखमसांवतावरि राजियांनीं नानजादी केली. त्यांची ही फौज कित्येक मारिली. यावरि लखम सावंत कुडाळ प्रांत सोडून फिरंगणांत बाहेर देशांत पळाला. कुडाळ देश राजियांनीं काबीज केला. फिरंगी यास राजियाचा धाक तेथें त्यास ठेवून घेववेना असें झालें. जागा कोठें नाहीं तेव्हां राजियाशीं राजकारण लावून पीतांबर शेणवी मच्छाहारी ब्राह्मण ह्मणून कुडाळी हेजीब पाठवून दिला. आणि राजियाचा कौल घेऊन भेटीस आला. भेट झाली. "आपण सांवत म्हणजे भोंसले यांचा गोत्रज. आपलें तुह्मीं चालावेणें उचित आहे " असें कित्येक बोलिल्यावरि राजियांनीं देशमुखी कुडाळची करार करून तनका दाखल सहा हजार होन वेतन करार करून द्यावें असें केलें. वाडा हुडा बुरजाचा बांधूं नये. कुडाळीं रहावें. जमाव करूं नये. असें करून ठेविलें. त्याचे सरदार राम दळवी व तान सांवत यांस हशमांची हाजारिया देऊन आपले आला-

---

* शहाजीस विश्वासघातानें धरून विजापुरास कोंडून ठेवणारा बाजी घोरपडा हाच. याचा सूड घेशील तरच माझा पुत्र तू खरा असें शिवाजीस शहाजीनें मागें लिहिलें होतें त्यावरून शिवाजीनें त्याचा या प्रसंगीं सत्यानास उडविला.

हिदा चाकर तिघे तीन जागां नामजाद ठेविले. पुन: लखम सांवताची व यांची भेट होऊं न दिली. असा कुडाळ देश काबीज केला. फोंड कोट इदलशाई होता. तेथें मोबतखान राजबिंडा सरदार जबरदस्त होता. ते जागां वेढा घालून, सुरंग लावून हुडे बुरूज उडविले. फोंड घेतलें. मोबतखानास कौल देऊन विजापुरास जावयास निरोप दिला. तेव्हां राजियाकडील सरदार इभ्रामखान मुसलमान मोठा धरकरी लष्करचा हजारी बरोबरि होता. त्यानें कष्ट मेहनत बहुत केली. फोंड घेऊन कडवाड, शिवेश्वर, मिरज, अंकोलें, कदरें, सुपे, उडवें हे कोट कोकणाचे कुल घेऊन गोकर्ण महाबळेश्वर वरघाट सुपें येथवर सरद लाविली. व गोंवियाचे फिरंगी यास दबावून त्याजवळून तोफा, नख्त, जड जवाहीर घेऊन आपलेंसे करून, त्यास उदमास कौल देऊन आला. दरफ्ती करावयासि निरोप दिला. असें कुल कोंकण काबीज केलें.

पुढें बिदनुरीं शिवापा नाईक संगम होता. त्याचें शहर बसनूर म्हणून थोर नामांकित होतें. दर्या किनारा, तेथें पालती पाठवून गाळती आणून, वरघाटें जातां मार्ग नाहीं ह्मणून पाणियांतील आपलीं जहाजें आणून सिद्ध करून, आपण राजा खासा जहाजांत बसून जाऊन बसनुरास एकाएकीं दिवस उगवावयासि गेले. शहरचे लोक बेहुशार होते. एकाएकीं जहाजांतून उतरले. शहर मारिलें. एक दिवस शहर लुटून फन्ना केलें. जैसी सुरत मारून मालमत्ता आणिली त्याप्रमाणें बसनूरची मत्ता अगणित माल जड जवाहीर कापड जिन्नस घेऊन आपले देशास आले. मत्ता सर्व पाहतां दोन कोटी होनांची आणिली.

त्या उपरि कारंजे मोंगलाईंत मोठें शहर होतें तेथून पालती आणून खासा राजियानीं लष्कर बरोबर घेऊन चालिले. जातां जातां औरंगाबादेची पेंठ मारिली. सात गांवची दौड करून जाऊन कारंजियावरि तीन दिवस मुक्काम करून कुल शहरचे वाडे काबीज करून मत्ता खणती लावून काढली. नक्त जड जवाहीर, सोनें रुपे, उंच कापड असें घेऊन स्वारी करून चालिले.

९८. हुबळी १६७३ सालीं लुटली. तेथें मुबलक दौलत सांपडली. हुबळीचें वर्तमान ऐकून बेदनूरकरानें शरण येऊन दरसाल करभार देण्याचें कबूल केलें. असें मां० ड० ह्मणतात. तेव्हां ही समुद्राच्या बाजूनें केलेली स्वारी "बार्सीलोर" याजवरील होय. बिदनूर आणि बसनूर अशीं दोन नांवें बखरींत दिलीं आहेत तीं भिन्न नगरांचीं की काय ? बार्सीलोर कोठें आहे ?

९९. कारंजें, करजें हें १६७० च्या दिल्बरांत प्रतापरावानें लुटिलें. ह्या स्वारींत विशेष गोष्ट ही झाली कीं प्रतापरावानें सर्व खानदेशामध्यें प्रत्येक गांवचे पाटील कुलकर्ण्यांपासून सरकारी वसुलापैकीं चवथाई शिवाजीस देत जाऊं असे करार लिहून घेतले व त्यास आलेल्या चवथाईबद्दल पा-

मोंगलाचे सुभे जागां जागां दिलेलखान व बाहादुरखान. एखलासखान व बेलोलखान व इंद्रमणी असे उमराव जागां जागां कोणी दहा हजार कोणी बारा हजार असे चौतर्फा चालून आले. त्यांशीं युद्ध करीत भांडत चालिले. मोठें मोठें झुंज करून मोंगल मारून गर्दीस मेळवून हत्ती घोडे उंट मालमत्ता पाडाव करून आणिली. आणि कुल गनीमाचे मजीर माघारे नामोहरम होऊन गेले. राजे आपले फौजेनिशीं सुखरूप देशास आले. पाठीवर दिलेलखान बारा हजार स्वारांनिशीं दहा बारा गांवें अंतरानें भीमातीर पावेतों आला. मग राजे राजगडास [ गेले. ] मालमत्ता संख्या पाहतां सात कोडीचा आकार झाला.

पुढें रायरीगड अदलशाही होता तो घेतला. राजा खांसा जाऊन पाहतां गड बहुत चखोट. चौतर्फा गडाचे कडे तासिल्याप्रमाणें, दीड गांव उंच, पर्ज्यन्यकाळीं कडियावरि गवत उगवत नाहीं. आणि धोंडा तासींव एकच आहे. दौलताबाद ही पृथ्वीवर चखोट गड खरा, परंतु तो उंचीनें थोडका. दौलताबादाचे दशगुणी गड उंच. असें देखोन बहुत संतुष्ट झाले. आणि बोलिले तक्तास जागा गड हाच करावा. असें करारीं करून तेथ गर्डी घर, वाडे, माडिया, सदरा चौसोपे आणि अठरा कारखौंने यांस वेगळाले महाल, व राणियांस महाल, तैशीच सरकारकुनास वेगळीं घरें, व बाजार, पंच हजारियास वेगळीं घरें, व मातबर लोकांस घरें, व गजशाळा व अश्वशाळा व उष्टरखाने पालखीमहाल व वहिलीमहाल[72], कोठी, थटीमहाल[73] चुनेगची चिरेबंदी बांधिले. राजियास प्रथम स्त्री संभाजी राजियाची माता होती ती निवर्तली. त्याजवरि राजियानीं साहा स्त्रिया केल्या. त्यामध्यें मोहित्यांची कन्या सोइराबाई गरोदर होती. तीस पुत्र जाहला. तो पालथा उपजला., राजियास वर्तमान सांगितलें. राजे ह्मणूं लागले कीं, " दिल्लीची पातशाई पालथी घालील " असें बोलिले. गम जोतिषी ह्मणों लागले कीं " थोर राजा होईल. शिवाजी राजियाहून विशेष किर्ति होईल "

---

( मागील पृष्ठावरुन पुढें चालू.)
वस्या देऊन, दरवर्षी असें केल्यास तुटीचें भय तुह्मांस नाहीं इतकेंच नव्हे तर तुमचें आह्मीं संरक्षण करीत जाऊं असेंही त्यांस सांगितलें.

७०. रायरीचें नांव पुढें 'रायगड' पडलें.

७१. हे कारखाने निरनिराळ्या ठिकाणी निरनिराळे प्रकारें दिलेले आढळतात. एके ठिकाणीं ते असे दिले आहेत:— खजीना—जामदारखाना—जिराईतखाना—पीलखाना—फरासखाना—तासेखाना—शिकारखाना—दारूखाना—उष्टरखाना—अबदारखाना—मुदपाक-नगारखाना-खलबतखाना--सराफखाना--शिलेखाना--तोफखाना--तालीमखाना--बंदीखाना.

७२. वहिलीमहाल = रथशाला.

७३. थटीमहाल = गोशाळा.

असें भाविष्य केलें. मग राजियानीं राजाराम[74] ह्मणोन नांव ठेविलें. आणि बोलिलें कीं, "राजाराम प्रजा सुखी राखील. आपणापेक्षां याचा पराक्रम होईल. नांवाची कीर्त बहुत होइल. आपलें नांव रक्षील तर एवढाच रक्षील." असें बोलिले आणि दान धर्म बहुत केला. पुढें मोरोपंत पेशवे यानीं त्रिंबकगडापासून सालेरी किल्या पावेतों किल्ले कित्येक घेतले. कितीएक नवे वसविले. असे चाळीस गड नवे कदीम[75] त्यांणीं घेतले. कोळवण काबीज केलें. रामनगर, जवाहीर हा देश घेतला. त्या देशांतही गड वसविले. अशी ख्यात केली.

हें वर्तमान दिल्लीस पातशहास सर्वही कळलें कीं, सुरत मारिली बसनूर मारिलें, बराणपूर औरंगाबाद मारिली. सालेरी आदीकरून सर्व किल्ले घेतले. खानदेश,बागलाण, गुजराथ, वऱ्हाड देश बांधीत चालिले." असें ऐकून बहुत कष्टी होऊन बोलिले कीं, काय इलाज करावा ? लाख लाख घोड्याचे सुभे रवाना केले ते बुडविले. नामोहरम होऊन आले. आतां कोण पाठवावें ? शहाजादे पाठवावे तरि तिकडेच फितवियांत मिळून दिल्लीच घेतील. याकरितां कोणी पाठवावयास दिसत नाहीं. या उपरि आपण खांसा कंबरबस्ती करून शिवाजीवर जावें तर शास्ताखानाचा न्याय जालियास काय करावें ? याकरितां शिवाजी जोंवर जिवंत तोंवर दिल्ली आपण. सोडीत नाहीं " असा विचार केला, आणि इखलासखान ह्मणजे केवळ शूर व बेलोलखान यांस बोलावून आणून वीस हजार स्वारांनिशीं सालेरीस रवाना केलें. सालेरी घेऊन फस्त करणें. तसें दिलेलखान यांस दहा हजार स्वारानिशीं अ हि वं त रवाना केलें. दिलेलखान येऊन रवळा-जवळयास लागले. गडकरी बरे भांडले. मोठें युद्ध झालें. गडहातास आला नाहीं. मोरोपंत पेशवे यांनीं उपराळियास मावळे लोक बारा हजार रवाना केले. त्यांनीं जाऊन छापे घातले. ऐसा घाबरा केला. रामाजी पांगेरा ह्मणून हशमांचा हजारी [ त्यानें ] हजार लोकांनिशीं कणेरागड आहे त्या खालें दिलेलखानाशीं युद्ध केलें. हजार लोक थोडे देखून दिलेलखान यानें फौजेनिशीं चालून घेतलें. रामाजी पांगेरे यानीं आपले लोकांत निवड करून निदान करावयाचे आपले सोबती असतील ते उभे राहणें, म्हणून निवड करितां सातशें माणूस उभे राहिले. तितकियानीं निदान करून भांडण दिधलें. दिलेलखान याची फौज [ इनें ] पाय उतार होऊन चालून घेतलें. चौफेरा

---

७४. या पुत्राचा जन्म चैत्र शुद्ध ९ स झाला ह्मणून 'राजाराम' असें नांव ठेविलें.

७५. कदीम = जुने.

श्री

# नागपूरकर भोंसल्यांच्या संबंधाचे कागदपत्र.

१. नागपुरकर भोंसल्यांच्या दोन बखरी आह्मांस मिळाल्या आहेत. त्यांतील कांहीं मजकूर वाचकांस कांहींसा अपरिचित असेल व नागपुराकडील सरदार, कारभारी, मानकरी, मुत्सदी यांची आमच्या इकडलि वाचकांस फारशी माहिती नसेल असें समजून त्या बखरी तूर्त छापणें प्रशस्त दिसत नाहीं. परंतु भोंसलेशाईंतील अनेक गोष्टींची आधीं थोडीबहुत माहिती झाल्यास बखर समजण्यास सुलभ पडेल व वाचण्यास ही गोडी लागून उत्साह वाटेल अशी अटकळ आहे. तर अशी माहिती बखरीच्या अगोदर किरकोळ लेखांच्या द्वारें वाचकांस सादर करण्याचें योजिलें आहे.

२. आज आरंभलेल्या नवीन सदरा खालीं नागपुरकर भोंसल्याविषयींचें कागदपत्र, तहनामे, यादी, सवालजबाब, हिशेब, पत्रव्यवहार, सनदा इत्यादि अनेक लहान मोठ्या लेखांचा समावेश होईल. हे लेख आह्मांस एकाच ठिकाणीं मिळाले आहेत असें नाहीं. कांहीं लेखांच्या दोन दोन तीन तीन प्रती ही मिळाल्या आहेत. त्यामुळें कित्येक दुर्बोध लेखांचा अर्थनिर्णय करण्यास चांगलें सुलभ साधन झालें आहे. शिवाय गिचमिड लिहिलेले मोडी लिपींतील लेख वाचतांना अक्षरें उमगण्याची जी अडचण असते ती ही कांहीं अंशीं दूर होणार आहे. यांतील कित्येक लेख भोंसल्यांच्या पदरच्या कामदारांकडून व मानकऱ्यांकडून नागपुर येथील एका वजनदार गृहस्थानें मिळवून देण्याच्या कामीं आमच्या तेथील साहाय्यकर्त्यांस पुष्कळ मदत केली या कामगिरीबद्दल आम्ही आपल्या ह्या साहाय्यकर्त्या सन्मान्य गृहस्थाचे आभारी आहों.

३. हे लेख छापतांना कालानुक्रमाकडे लक्ष देणें प्रस्तुतच्या स्थितींत दुरापास्त आहे. याचें मुख्य कारण सर्व कागदपत्र यादी वगैरे आज आह्मांपाशीं नाहींत. तरी साधारण वाचकांस आणि विशेषतः इतिहास रचनाकारांस ह्या लेखसंग्रहाचा उपयोग व्हावा व ठिकठिकाणीं पूर्वापार ऐतिह्यांवर अनुसंधान ठेवून हवाला दाखल करण्याची सोय व्हावी म्हणून या प्रकरणास पृष्ठांक आणि प्रत्येक लेखास अनुक्रमांक घालण्याची तजवीज केली आहे.

४. मूळ लेखांत कोठें ही फेरफार केला नाहीं. जेथें अर्थबोध मूळींच झाला नाहीं तेथें मुळांत जशीं अक्षरें होतीं तशींच प्रतींत अक्षरें लिहिण्याचा यत्न केला आहे. वाचकांच्या सोईकरितां क्वचित् स्थळीं विराम चिन्हें दिलीं आहेत. तसेंच पूर्वापार संदर्प जुळण्याकरितां कोठें कोठें एकादा शद्ब कौंसांत घातला आहे. याशिवाय कांहींएक कमज्यास्त केलें नसल्यामुळें हा लेखसमुदाय मूळ लेखाची 'अस्सल बरहुकुम नकल' आहे असें ह्मणतां येईल.

## [१] "सेना साहेब सुभा" पद कोणा पुरुषापासून चाललें याचा तपशील.

१. शाहू महाराजांस साताऱ्यास दिल्लीहून बादशहानीं[१] रवाना केले ते बऱ्हाणपुरचे मुक्कामीं दाखल झाले. ताराबाई[२] शाहू महाराजांची चुलती[३] साताऱ्यास मालकी करून होती. तेवेळेस परसोजी भोंसले याजला वर्तमान समजलें कीं शाहू महाराज साताऱ्यास येतात. तें समजून बऱ्हाणपुरचे मुक्कामीं भेट घेऊन त्यांजसमागमें साताऱ्यास आले. तेथें ताराबाईनीं बंड केलें होतें त्याचे पारिपत्याकरितां महाराजास साथ देऊन बंड परागंदाकरून स्वराज्यावर शाहू महाराज स्थापित झाले. ते वेळेत महाराज सरफराज होऊन परसोजी भोंसले उपयोगीं[५] पडले सबब यांजला वऱ्हाड प्रांताचे "सेना साहेब सुभ्या"चें पद देऊन जरीपटका व साहेबनौबद[६] व शिक्केकटार वस्त्रें देऊन सन १११७ फसली शके १६३० चे सालीं रवाना केलें. त्यांनीं वऱ्हाड प्रांतीं येऊन त्या प्रांताचा बंदोबस्त ठेऊन स्वस्थान कायम करून दोन वर्षें राज्य केलें. त्यांचा काळ सन १११९ सालीं झाला.

२. बाद त्यांचे चिरंजीव कान्होजी भोंसले यांजला सन ११२० सालीं "सेनासाहेब सुभ्या"चें पद देऊन रवाना केलें. त्यांनीं १८ वर्षें राज्य केलें. त्यांस संतति नव्हति सबब त्यांचे धाकटे बंधू बिंबाजी भोंसले यांचे

---

१. अझीमशहा—औरंगजेबाचा मुलगा—यानें झुल्फिकारखान्याच्या सांगण्यावरून शाहूस इ० स० १७०८ त मुक्त केलें.

२. राजारामाची बायको.

३. ताराबाई. आपला मुलगा 'वेडा शिवाजी' याच्या नांवानें राज्यकारभार चालवूं लागली.

४. मोठ्या कामगिरीबद्दल पदवृद्धि करण्याविषयीं उत्सुक, न्यहाल.

५. शाहूस तोतया ठरविण्याकरितां ताराबाईनें परसोजीचा भाऊ बापूजी भोसले यास धाडून दिलें. त्याची व शाहूची भेट गोदावरी-तीरीं झाली. तेव्हां शाहू खरा अस्सल आहे, तोतया नव्हे अशी त्याची पूर्ण खात्री झाली. नंतर उभयतां भावांनीं शाहूच्या ताटांत सर्वां समक्ष भोजन केलें. या योगानें सर्वांचे संशय दूर झाले. अशाप्रकारें परसोजी शाहूच्या उपयोगीं पडला.

६. राजादिक सत्ताधारी पुरुषाच्या स्वारींत हत्तीवर ठेवलेला मोठा नगारा.

अनुक्रमणिका

चिरंजीव रघोजीबावा उर्फ बाबासाहेब यांजला आपले जवळ भामे येथें ठेऊन पुत्रवत् मानिलें. नंतर कान्होजी भोंसले यांस पुत्र रायाजी भोंसले झाले. सबब रघोजी भोंसले ऊर्फ बाबासाहेब हे साताऱ्यास जाऊन शाहू महाराजापाशीं राहिले. महाराजाकडून फत्तेसिंग* भोंसले †कर्नाटकचे मोहिमेवर रवाना झाले त्यांसमागमें रघोजी भोंसले यजला दिलें. त्यांनीं कर्नाटकचे प्रांतीं जाऊन स्वपराक्रम व जवामर्दी करून प्रांत सर केला. नंतर साताऱ्यास आले. नंतर एक दिवस शाहू महाराज शिकारीस गेले. समागमें रघोजी बाबासाहेबही होते. महाराज जंगलांत पालखींतून उतरून उभे राहून शिकारीचा तमाशा पहात राहिले. तितकियांत एक वाघ मातब्बर बिडांतून निघून महाराजाचे सामने आंगावर चालून आला. नजीक येऊन झेंप टाकावी तितकियांत रघोजी भोंसले नजीक उभे होते. त्यांनीं जलदी करून तलवारीनें वाघ मारिला, व महाराजांस वांचविलें. याजवरून महाराजांनीं बहुतशी खातरतसरीफ ‡ करून आपले जवळ ठेविलें. इकडे कान्होजी भोंसले यांनीं वऱ्हाड प्रांतीं बदफैलीवर जुलूम करून महाराजाशीं बेगी झाले. सबब त्यांचे पारिपत्यास रघोजी भोंसले ऊर्फ बाबासाहेब या हास मुकरर करून समागमें फौज देऊन वऱ्हाड प्रांतीं रवाना केलें. त्यांनीं कान्होजी भोंसले याजला कैदीत करून साताऱ्यास घेऊन आले.

३. त्याजवरून महाराज सरफराज होऊन रघोजी भोंसले यांजला सेना-

---

७. हा गांव वऱ्हाडांत यवतमाळ शहराच्या दक्षिणेस सुमारें ८।९ कोसांवर आहे. राज्यप्राप्ति होईल असा रघोजीस ह्या ठिकाणीं दृष्टांत झाला अशी आख्यायिका आहे. ह्या स्थळीं अनेक जंगी इमारती मडप झाल्याच्या खाणाखुणा कचित् दृष्टीस पडतात व फक्त बैरागी लोकांना ५,००० उभरटा होता असें सांगतात. याजवरून रघोजीच्या सैन्याची जमात येथें केवढी होती याची अटकळ करितां येईल.

८. साताऱ्यास जाण्यापूर्वी रघोजी 'देवगड' चा राजा चांद सुलतान याजकडे गेला. तेथें रघुनाथभट झिंगरे पटवर्धन यांस रेशमी व लोंकरी मालाबद्दल सरकारी जकात न दिल्यावरून कैदेंत ठेविलें होतें. त्यांस रघोजीनें बन्दमुक्त केले. पटवर्धनानीं रघोजीची कोणती कामगिरी केली हें पुढें ओंलच आहे. देवगडाहून रघोजी एलिचपुरच्या सुभेदाराकडे गेला. तेथें कांहीं दिवस राहून साताऱ्यास चालता झाला.

* अक्कलकोटकर भोंसल्यांचें आद्यपूर्वज

† ही कर्नाटकची स्वारी इ० स० १७४० च्या पूर्वीची असावी. पण तिजविषयीं ग्रां० ड० च्या इंग्रजी इतिहासांत उल्लेख नाहीं.

‡ पराक्रमानें संतुष्ट होऊन सन्मानार्थ पोषाक अलंकार इत्यादि देणें.

९. वांकडेपणा करणारा, दंगेखोर, बंडखोर.

१०. इ० स० १७३८ त कान्होजीस रघोजीनें वऱ्हाडांतील वणी तालुक्यांतील मंदार नांवाच्या गांवीं पकडिलें. कान्होजी साताऱ्यास बंदीखान्यांत असतांच मरण पावला.

साहेब सुभ्याचीं वस्त्रें व जरीपटका व साहेबनौबद व शिक्केकटार व कोन्हेर* राम दिवाण व रखमाजी §गणेश चिटणवीस व पटवर्धन शिक्केनवीस[11] व बक्षी व फडणवीस वगैरे मुत्सद्दी आणि इतर सरदार मानकरी बरोबर देऊन सन ११३९ सालीं वऱ्हाड प्रांतीं रवाना केले. त्यानीं वऱ्हाड प्रांताचा बंदोबस्त करून गोंडवण व बंगाला व उडीसापर्यंत मुलूख काबीज करून अमल बसवून २१ वर्षे राज्य करून ११६१ सालीं फाल्गुन शुद्ध ३स त्यांचा अंतकाळ झाला.

४. नंतर त्यांचे वडील पुत्र जानोजी भोंसले- सन ११६२चे सालीं गादीनशीन[12] झाले. त्यांचा काळ सन ११८० चे सालीं वैशाख मासीं १९ स झाला. त्यांजला संतति नव्हती. सबब त्यांचे धाकटे बंधु मुधोजी बाबा भोंसले यांचे वडील पुत्र रघोजी भोंसले ऊर्फ बापू साहेब यांजला जानोजी बोवांनीं मृत्यु होण्याचे पूर्वींच दोन वर्षें वटींत घेतलें होतें. नंतर जानोजी बाबाचा काळ ११८०चे सालीं झाला.

५. यावर सन ११८२चे सालीं रघोजी भोंसले याला पुण्याहून वस्त्रें येऊन गादीनशीन[12] झाले. त्यानीं सन १२२५ साल पावेतों राज्य करून तेच सालीं फाल्गुन मासीं वद्य ९ रोजीं † शुक्रवारीं मृत्यु पावले. त्यानीं ४३ वर्षें राज्य केलें.

६. उपरांत रघोजी भोंसले ऊर्फ बाळा साहेब सन १२२५ सालीं वैशाख मासीं पुण्याहून वस्त्रें येऊन गादीनशीन झाले, त्यानीं ९ महिने राज्य करून त्यांचा ‡ काळ सन १२२६चे सालीं माघमासीं १९स तारीख १ फेब्रुवारी शनवार रोजीं पहाटेस ६ घटका रात्रीस झाला.

७. उपरांत मुधोजी भोंसले[13] ऊर्फ आपा साहेब यांनीं कंबेष १ वर्ष राज्य करून कंपनी सरकाराशीं बिघाड करून परागंदा[14] झाले.

---

* याची साद्यंत हकिकत पुढील लेखांत पहावी.

§ हे कायस्थ परभू विद्यमान माधवराव गंगाधर चिटणीस यांच्या घराण्याचे मूळ पुरुष.

११. रघुनाथभट पटवर्धन यांणीं आपल्या बायकोच्या हातांतील पाटल्या मोडून रघोजीसाठीं शिक्का करण्याकरितां पाटल्यांचें सोनें दिलें म्हणून पटवर्धन हेच शिक्केनवीस झाले. रघोजीचा शिक्का वर्तुलाकार असून त्यांत पुढील अक्षरें होतीं:—

"शाहुराज-पदांभोज-भ्रमरायित-चेतसः"
"त्रिम्बाहमजस्य मुद्रेयं राघवस्य विराजते"

१२. सिंहासनारूढ.

† इ० स० १८१६ मार्च २२.

‡ परसोजीस मारण्याच्या कामीं रामचन्द्र वाघ व मनभट यांचें अंग होतें असा प्रिन्सेप् याचा लेख आहे.

१३. हा रघोजी भोसले ऊर्फ बापूसाहेब याचा सहोदर बंधु व्यंकाजी ऊर्फ मन्याबापू याचा मुलगा, म्हणजे रघोजीच्या पुतण्या.

१४. सिताबर्डीच्या टेंकडीवर आपासाहेबाची इंग्लिश लोकांशीं लढाई झाली.

( पुढें चालू. )

८. नंतर सन १२२८चे सालीं श्रावणमासीं रघोजी भोंसले ऊर्फ बापू साहेब यांची वडील कन्या बनूबाई व्यंकटराव गुजरास दिली होती त्यांचा पुत्र बाजीबा गुजर याजला श्रीमंत बांकाबाई[16] साहेबांनीं दौलतीचे वारस समजून परसोजी भोंसल्याची ३ री स्त्री दुर्गाबाई[17] यांचे ओटींत घेऊन रघोजी ‡‡ भोंसले नांव देऊन दत्तविधान केलें. कंपनी सरकारानीं दोस्तीची पासखातर येऊन गादीनशीन केलें. याचा बंदोबस्त पूर्वींप्रमाणें चालला. यानीं ३५ वर्षे राज्य करून सन १२६३ सालीं मार्गशीर्ष महिन्यांत शुद्ध ११स काळ झाला.

———०००———

[ २ ] [ अनुकूल काल होतो तेव्हां बळ बुद्धि तेज यश देतो ।
प्रतिकूल तोचि होउनि माघारें दत्त सर्वहि घेतो ॥ १ ॥
मोरोपंत—मौसलपर्व* ]

कैफीयत बापुंजी जिवाजी कोल्हटकर, मुजूमदार, मुक्काईम श्रीमंत महाराज राजश्री सेना साहेब सुभा बहादूर, सुरू सन १२६४ साल फसली.

१. आमचे मूळपुरुष तीर्थस्वरूप राजश्री रामाजी नारायण कोल्हटकर यांचे वतनदारीचा गांव पांडवगड प्रांत वाई येथील वतनदारी व राहणें घरदार वगैरे यांगांवीं, तेव्हां कोंकणांत नेवरें येथील देशमुखी याजकरितां,

( मागील पृष्ठावरून )
ही लढाई इ० स० १८१७ चे नोव्हेंबर महिन्याचे २६ वे तारिखेस तिसरे प्रहरानंतर सुरू झाली व दुसऱ्या दिवशीं दोन प्रहरां समाप्त झाली.

१५. आपासाहेबास अलाहाबादेच्या किल्ल्यांत ठेवण्याकरितां नागपुराहून ता० २ मे रोजीं रवाना केलें. वाटेंत ता० १३ रोजीं जबलपुराजवळ रायचूर म्हणून एक खेडें आहे तेथून तो पळाला.

१६. ही दुसऱ्या रघोजीची तिसरी बायको. ही मोठी राजकारस्थानी होती. हिचा इंग्रज सरकारावर विश्वास आणि प्रेमभाव दृढ होता. ही १८५८ त मरण पावली.

१७. काशीबाई व अहिल्याबाई हीं दुसऱ्या दोघीजणींचीं नांवें.

‡‡ सन १८१८ चे जुनच्या २६ वे तारिखेस ' रघोजी ' नांव ठेवून राज्याभिषेक केला.

१८. इ० स० १८५३ चे डिसेंबरचे ११ तारिखेस.

* ही आर्या प्रस्तुत लेखास किती अनुरूप आहे हें मार्मिकजनास सांगणें नको. ही मूळ लेखाच्या माथ्यावर नाहीं. परंतु तदन्तर्गत विषयाचे उत्तम बोधक म्हणून येथें दिली आहे.

१. हे गृहस्थ सुमारें १० वर्षांपूर्वी वारले. यास तीन पुत्र, पैकीं एक हयात आहे. दोन ही उपाध्यांचे घरीं यांचे नातू दत्त दिले आहेत. यांचे घर वगैरे सर्व जळून आज या गृहस्थाचे वंशजांची हलाखी इतकी आहे कीं तिचें वर्णन करणें दुःखद आहे. एकंदरीनें या घराची उतरती कळा कशी शनैः शनैः येत गेली याचें वर्णन पुढील लेखावरून कळेलच.

२. सौम्यप्रकृति, सुगुणसंपन्न.

३. हा गांव रत्नागिरीपासून चार कोशावर आहे.

वडिलांचे जाणें हरहमेष मौजे नेवरे येथें. मार्गीं कोंकण प्रांतीं कोयना नदीचे तीरीं भैरवगडाचे खालीं भोंसले राजश्रीचे बापूजी वडिल बंधु व मधले परसोजी व कनिष्ट साबाजी भोंसले त्रिवर्ग बंधु व मुलं माणसें खटल्यासमवेत वस्तीस राहत होतेत. त्या गांवीं मुक्काम होण्यामुळें भोंसल्यांनीं आपले घरीं ठेऊन घेऊन शिधासरंजाम वगैरेची सरंभराई करावी. या अन्वयें दिवसोंदिवस स्नेह विशेष झाला. असें असतां, हाफसीयानें भोंसल्यावर दगा करून खटला सर्व लुटून कुटुंबासमवेत आपले कैदींत ठेवलें. हें वर्तमान रामाजीपंतास समजल्यावरून हाफसीयाजकडेस जाऊन सवाल जातीनिशीं केला. जबाब दिल्हा जे भोंसले याजबाबत तीन हजार रुपये जो कोणी देईल त्यांचे सुपुर्द*करण्यांत येईल. हें ऐकोन आपले गांवीं येऊन जिंदगी आपली विकून तीन हजार रुपयांची भरती करून हाफती यांजला देऊन भोंसले यांजला सोडून पांडववाडीस आणून पाहाडा खालीं घर तयार करून देऊन जिंदगी कालानुरूप जमऊन देऊन ठेविलें. आपले वतनाचे विभागांतून खर्चीची मदत करावी. याजमुळें स्नेह अधिकोत्तर जाला. तेव्हां भोंसल्यांनीं आपली उपाधिक वगैरे आमचे वाडिलांस दिल्हि. नंतर बापूजी भोंसले यांचे चिरंजीव राजश्री बिंबाजभोंसले यांचे स्त्रियेचे पोटांत दोन वर्षांचें सल होतें. याजमुळें फार चिंतेंत होते. पंत मजकूर याजला उपासना श्री रघुवीर स्वामीची व साक्षात्कार; हें बिंबाजी बाबास समजल्यावरून निष्टा पंताजवळ जडून अनुग्रहें आपण स्त्रियेसमवेत घेतला. रामाजीपंतानीं आपले येथील श्रीरामचंद्रस्वामीची धातुमूर्ति बिंबाजी बाबास पूजे करितां दिली. तीच मूर्ति हा काळपर्यंत सरकारांत देवघरांत आहे. बिंबाजी बाबाचे स्त्रियेस नित्य तीर्थ देत असावें व पंतानीं श्रीरघुवीर स्वामीस करुणायुक्त प्रार्थना केली, जे बिंबाजी बाबास पुत्र जाल्यास नामाभिधान स्वामीचेंच ठेऊं; ऐसा नवस केला. तों श्रीरामाचे कृपेकडून सन १९०७ चे सालीं बिंबाजी बाबास पुत्रच झाला. नवसाप्रमाणें नांव रघूजी भोंसले ठेविलें. कलम अव्वल.

१. श्री छत्रपति संभाजी महाराज यांजला बादशहांनीं फौज पाठवून

४. तरतूद, सामग्री पोचवणें.

५. जंजिरेकर मुसलमान सरदार याकुदखान, याचा मूळ प्रांत आबिसिनिया; याच्या प्रांतास 'हपसाण' ह्मणतात.

* स्वाधीन करणें, कबज्यांत देणें.

६. रामाजीपंत कोल्हटकर.

७. गुरुमंत्रादिक उपदेश.

८. पुरुषांपेक्षां स्त्रिया उपदेश घेणाऱ्या ज्यास्त आढळतात.

९. इ० स० १६८८ मध्यें संगमेश्वराजवळ संभाजीस, औरंगजेबाचा सरदार तकरीबखान यानें पकडिलें.

कबजी करून धरून नेऊन समक्ष हजर झाले. ते पातशहानीं यांचे खुबसुरतीस[10] पाहन द्रवित होऊन आमचा "खाना खा" असे बोलण्यांत आणिले. उत्तर केले कीं आपली कन्या मजला प्राप्त जाली असतां आज्ञेनुरूप हजरच आहो. या सख्त जबाबावरून मर्जी फार खप्पा होऊन प्रींणांत[11] केला. हे वर्तमान पातशाहींजादीस[12] समजल्यावरून लग्न आपलें केले नाहीं. शोध करून महाराजाचे चिरंजीव शाहू याजला बहुत दिवस आपले अटकेत ठेविले. ते प्रसंगीं समागमें राजश्री विठ्ठल कान्हो ठोसर वाकनैवीस[13] कुटुंबासुद्धां होते. याजला कन्या जाली तिजवर प्रीति शाहू महाराजाची पुत्रवत्प्रमाणें ऐसे असतां कांहीं एक दिवसांनंतर पादशहाची मर्जी खुष होउन सरदेशमुखी चवथाई बाबती व खिलात वगैरे देणगी देऊन शाहू महाराज यांजला आपले नातू असें म्हणोन साताऱ्यास रवाना केले. तों साताऱ्या नजीक स्वारी येण्याची आवाई श्रवण होतांच रामाजीपंत यांणीं भोंसले यांजला समागमें घेऊन व चिरंजीव कोन्हेर राम यांजला समागमें घेऊन चलकुंचांतच[14] महाराजाच्या भेटी झाल्या. कोन्हेर राम यांचे वय लहान फार खुबसुरत व चालाखी पाहून त्याच मुक्कामीं विठ्ठल कान्हो ठोसर यांची कन्या देऊन विवाह केला. महाराजांनीं आपले जांवई असे ह्मणून नंतर कोन्हेर राम हरहमेष साताऱ्यास जात ते वेळेस [ त्यानीं ] समागमे रघोजी भोंसले यांजला नेत असावें. बाबासाहेब अवतारी पुण्य पुरुष, याजमुळे कोन्हेर राम यांचे मनांत ध्यास हाच कीं, बाबासाहेबांस पद मोठे मिळावें; याजकरितां महाराजाचे कारपरदार[15] मोठमोठीं माणसें चिटणवीस[16] वगैरे याचा स्नेह, बाबासाहेबांशीं करून सर्वांचे मनांत वागले कीं, बाबासाहेबांस छत्रपति महाराजाकडून मोठे पदाचें काम देववावे दुसरे, महाराजास कोन्हेर राम यांनीं विनंति केली जे रघुजी भोंसले हे आपले मेहुणींचि[17] चिरंजीव होत. हें समजविण्यावरून महारा-

---

१०. लावण्य, सौंदर्य.

११. संभाजीस तुळापूर येथें फाल्गुन वद्य अमावास्या शके १६११ रोजीं ठार मारिलें.

१२. बादशहाची कन्या. ही बापास म्हणाली "तुमचे देखत या मुलाचे बापानें माझें नांव घेतलें, तेव्हां हा पत्र माझा आहे याजवर आपण कृपा करित असावी व मुलास जननीयात येण्याची परवानगी द्यावी" ना० भों० बखर.

१३. श्रीमंत लोकांकडे चारी, पाणके, कामाठी वगैरे यांजवर जो मुख्य कामगार असतो तो. सर्व जेवण खाणाची तजवीज याचे मार्फत व्हावयाची. अशाच कामगारास इमजीत 'Steward' म्हणतात.

१४. कूच करीत असतां मार्गांत.

१५. कारभारी मंडळ.

१६. खंडेराव बल्लाळ चिटणवीस.

१७. ही चूक दिसते. शाहुची मेहुणी रघोजीस दिली होती.

असी कृपावलोकनें करून बाबासाहेबाकडे पाहत होते. परसोजी भोंसले यांनी चिरंजीव कान्होजी भोंसले यांजला 'सेनासाहेब सुभ्या'चीं वस्त्रें देऊन वऱ्हाड प्रांतीं रवाना पेशजी कांहीं एक दिवस केले होते. तेव्हां ते वऱ्हाडप्रांतीं राहून होते. तों त्याचे कारभाराची महाराजाचे मनांत विकृति होऊन बोलले, जें कान्होजी भोंसले यांजकडून सेनासाहेबी काढावी. त्यास धरून आणावें ; या कामीं कोणाचीं योजना करावी. तों चिटनवीस याजला अगत्य वाद फार. यांनीं विनंति केली कीं, या कामीं सेनासाहेबीचीं वस्त्र रघोजी भोंसले यांजला देऊन रवाना केल्यास बंदोबस्त नीट राहील. उत्तर झालें जे कान्होजी भोंसल्याचे [पुतणे.] चुलते पुतणे एक झाल्यास कैसें होईल ? तर राजेश्री कोन्हेर राम हे जामनी देतील तर रवाना करावें ; याजवरून कोन्हेर राम हे यांनीं आपली जामनी देऊन विनंति केलीजे याजला राहण्याकरितां याचे खटल्याजोगी जागा एखादी स्वामीनें देववावी. या विनंतीवरून देऊर[१८] हा गांव मोकासा वंशपरंपरा बाबासाहेबांस करून देऊन सेनासाहेबीचीं वस्त्रें देऊन कोन्हेर राम आमचे पणजे समागमें रवाना केले. तेसमयीं महाराजानीं कोन्हेर राम याला लग्न प्रसंगीचें आंदण देणें राहिलें तें आंदण मुजेमूचें सेनासाहेब सुभे यास आज्ञा केली कीं, तुह्मी आपले सेनासाहेबीचे मुलुक तील मुजमूचा दरख देत जाणें. मुजमूचे कोन्हेर राम जांवई सबब आम्ही आंदण दिली. बाबासाहेबांनीं विनंति केली कीं, आज्ञेप्रमाणें घडून येईल. कधींही अंतर नाहीं. ऐसें होऊन बाबासाहेब व कोन्हेर राम वऱ्हाडांत येऊन कान्होजी भोंसले याजला वणी जवळ धरून कैद करून पुन्हा साताऱ्यास जाऊन महाराजाजवळ कान्होजी भोंसले दाखल केले. कलम दुय्यम.

१. कान्होजी भोंसले साताऱ्यांत दाखल झाल्याबाद श्रीमंत राजश्री रघोजी भोंसले सेनासाहेब सुभा याजला बंगाला व झाडी वगैरे सर करण्याकरितां अज्ञा झाली व हमराइत सदरची भली माणसें विश्वासुक दिले. बितपशील:—

कोन्हेर राम आमचे पणजे यांजला दिवाणगिरीचें काम देऊन दरोबस्त

---

१८. हा गांव साताऱ्यापासून ६ कोसांवर आहे. सन १८६२ चे जून महिन्यांत गव्हरनर जनरल साहेबानें आपल्या सहीचें विद्यमान श्रीमंत जानोजी महाराज भोंसले यास एक इनामपत्र दिलें, त्यांत " राजाबहादूर आफ् देऊर " हा किताब दिला.

१९ मजमूदारी. मजमूदाराचें काम ; दप्तरचे हुकूम वगैरे लिहिणें व जमाखर्चाच्या हिशोबांवर "मर्तूबमूद" हीं निशाणी लिहिणें हें होतें. यास 'पत अमात्य' म्हणत.

अनुक्रमणिका

| पृष्ठ | ओवी | चरण | मूळपाठ | पाढांतर. |
|---|---|---|---|---|
| २४३ | ४४ | १ | हे खेचरी | हे अनिवार खेचरी |
| २४४ | ८९ | २ | विचित्र | विविध |
| | | | **अध्याय २३.** | |
| २४५ | ३ | ४ | दुश्चित | दुःखानें |
| २४५ | ५ | २ | घेऊनी मृगा पळा- ला वेगीं | म्हणोनी पातलों लगब- गीं। |
| २४५ | ९ | २ | हरिलीं | देखत हरिलीं |
| २४६ | १३ | १ | येरु दक्षिणेकडे वृक्षीं । | तंव दक्षिणाविप दिसे वृक्षीं |
| २४६ | १४ | १ | कर्दळी वृक्षाचा | कदंब द्रुमाचा |
| २४६ | १६ | ४ | सुवासा | सुस्वरें |
| २४६ | १७ | १ | हरें | पांडवें |
| २४६ | १९ | २ | जळ अगाध | तें कबंध |
| २४६ | २० | ३ | तळीं विशाळ | तळीं महा विशाळ |
| २४६ | २१ | १ | नकुलातें | सहदेवातें |
| २४६ | २१ | २ | सहदेवातें | नकुलातें |

| पृष्ठ | ओवी | चरण | मूळपाठ | पाठांतर. |
|---|---|---|---|---|
| २४६ | २२ | १ | जल-प्राशन | तृषाहरण |
| २४६ | टीप * | २ | आतां | तत्वतां |
| २४६ | टीप * | ३ | नकुल | सहदेव |
| २४७ | २६ | १ | दानवांतें | मानवांतें |
| २४७ | ३० | १ | पार्थें सोडूनी | पार्थें वारितां सोडूनी |
| २४७ | ३२ | ४ | कपाळ हातें | करें लल्लाट |
| २४७ | ३४ | ४ | ग्राशिलें | मारिलें |
| २४७ | ४० | ३ | देव | धर्म |
| २४८ | ४२ | ३ | लाहिजे | पाविजे |
| २४८ | ५१ | ३ | म्हणसी | म्हणिजे |
| २४८ | ५२ | ४ | हीन | मनुष्य |
| २४९ | ५९ | ३ | मान्य पंडित | जी बहुत |
| २४९ | ६१ | ३ | मूर्ता | भृत्यां |
| २४९ | ६२ | ४ | तुझेनी वचनें | तूं सेवीं जीवन |
| २४९ | ६३ | १ | कृपण | कृत्रिम |
| २४९ | ६३ | ३ | लोभाचे नि लाभें | भोगाचे नि लोभें |

| पृष्ठ | ओवी | चरण | मूळपाठ | पाठांतर. |
|---|---|---|---|---|
| २४९ | ६४ | ३ | बलिष्ठ | हळुवट |
| २४९ | ६५ | (पूर्वार्ध) |  | कवण पूजनीं पावे थोरी कवण देव श्रेष्ठाधिकारी |
| २४९ | ६९ | ४ | वाहे | बाढे |
| २५२ | ११५ | १ | आतां | तत्वतां |
| २५३ | ११५ | ४ | सुबुद्धी | सुशब्दी |
| २५३ | ११९ | ३ | होत वावो | पाहा हो |
| २५३ | ११९ | ४ | संग्रह पापाचे | संग्रह नासे पापाचा |

**समाप्त.**

अनुक्रमणिका

## छापून प्रसिद्ध झालेल्या ओव्यांहून अधिक ओव्या मिळाल्या त्या.

**अध्याय १ ला.**

| पृष्ठ | ज्या दोन ओव्यांचे मध्यें ओवी असावयाची त्यांचे अंक. | अधिक ओव्या. |
|---|---|---|
| ११ | ६६— ६७ | भोजनीं तोषवी ब्राम्हण ।<br>नित्य नित्य पुराण—श्रवण ॥<br>सकळां सहित कुरु—नंदन ।<br>काम्यक—वना पातला ॥ १ ॥ |
| १६ | ११३— ११४ | दुरी यादव पांचाल ।<br>आला नाहीं जंव गोपाळ ॥<br>पांडव आहेत जंव निर्बळ ।<br>तंव मारूनी सांडावे ॥ १ ॥ |
| २० | १६१ च्या पुढें | इति आरण्य पर्व भारत ।<br>लीला—विश्वं भरानुगृहीत ॥<br>मुक्तेश्वराचा वचनार्थ ।<br>पवित्र—प्राय परिसोत ॥ १ ॥ |

**अध्याय २ रा.**

| पृष्ठ | ओवी संख्या. | अधिक ओव्या. |
|---|---|---|
| २६ | ५८— ५९ | धर्म निरूपणाचे शब्द ।<br>अनाचारिया हृदय-भेद ।<br>तेंवी भीम—प्रहारें खेद ।<br>असुर पावे आगळा ॥ १ ॥ |
| २७ | ८९चे पुढें | इति आरण्य पर्व भारत ।<br>मुक्तेश्वर—कवि—विरचित ॥<br>श्रोतीं देऊनी चित्त ।<br>परिशिलें पाहिजे ॥ १ ॥ |

**अध्याय ३ रा.**

| पृष्ठ | ओवी संख्या. | अधिक ओव्या. |
|---|---|---|
| २९ | १७— १८ | हें देखूनी वेगवान । |

| पृष्ठ | ओवी संख्या | | आधिक ओव्या. |
|---|---|---|---|
| | | | सौभ–सेना आति दारुण ॥ |
| | | | वावुनिया धनुष्य बाण । |
| | | | सांबा उजू लोटले ॥ १ ॥ |
| २९ | २२— | २३ | वांकुडी घालिजे महा घनीं । |
| | | | तेंवी वर्षाव बाणीं । |
| | | | मांडिला देखोनी द्वारका–जनीं । |
| | | | महा कल्पांत माविला ॥ १ ॥ |
| ३४ | ७२— | ७३ | सांगे उग्रसेनाचीं वचनें । |
| | | | शाल्वें घालूनीं घालणें ॥ |
| | | | वसुदेव घेतला प्राणें । |
| | | | सर्व यादवां देखतां ॥ १ ॥ |
| | | | **अध्याय ४ था.** |
| ३७ | १३–– | १४ | सत्य चि एक महाबळ । |
| | | | ऐसा ज्याचा निश्चयो अचळ ॥ |
| | | | ते पावती कैवल्य–फळ । |
| | | | पृथ्वी–तळ तें किती ॥ १ ॥ |

| पृष्ठ | ओवी ओव्या | | अधिक ओव्या. |
|---|---|---|---|
| ३८ | २०–– | २१ | ब्राम्हणांचें आशीर्वचन । |
| | | | तें क्षत्रियां शस्त्र जाण ॥ |
| | | | ब्राम्हण–कृपेचें अंग–त्राण । |
| | | | वज्र कवच अक्षयी ॥ १ ॥ |
| ४० | ४५— | ४६ | क्रूराशी सेविती सेवक । |
| | | | क्रूराशी भीति प्रजा लोक ॥ |
| | | | क्रूरास्तव महा धाक । |
| | | | शत्रु वाहाती सर्वदा ॥ १ ॥ |
| ४२ | ७०–– | ७१ | हा चि जपतां सर्व काळ । |
| | | | इच्छिलें तें पावशी फळ ॥ |
| | | | ऐसें बोलोनी दीन दयाळ । |
| | | | अदृश्य झाला ते ठायीं ॥ १ ॥ |
| ४५ | १०८— | १०९ | धनुष्य–बाण सज्जुनी मुष्टी । |
| | | | किरात लागला दिसे पाठी |
| | | | वराह येउनी पार्थी निकटी । |
| | | | रक्षीं रक्षीं म्हणतसे ॥ १ ॥ |

| पृष्ठ | ओवी संख्या | अधिक ओव्या. |
|---|---|---|
| ४७ | १३०—१३१ | लीले कारिशी विश्व—जनन ।<br>कृपा—दृष्टी प्रति—पालन ॥<br>प्रलयीं करूनी सर्व दहन ।<br>शेष उरसी तूं एक ॥ १ ॥ |
| ४८ | १३९—१४० | अस्त्र तुझें अत्यद्भुत ।<br>ज्यातें म्हणती पाशुपत ॥<br>तें मज देऊनी सनाथ ।<br>स्वामीनें केलें पाहिजे ॥ १ ॥ |
| | | **अध्याय ५ वा.** |
| ४९ | २५—२६ | जे धर्म वंचिती धनी ।<br>ने कृपण युद्धीं प्राण—दानीं<br>अतिथी दवडिले भोजनीं ।<br>ते तये स्थानीं वाळिले ॥ १ ॥ |
| | | **अध्याय १७ वा.** |
| १८९ | ९१—९२ | कर्ण शकुनी दुःशासन ।<br>सकळ जळसंद विकर्ण ॥<br>रथारूढ अवघे जण ।<br>युद्ध—कदना मिसळले |
| | | **अध्याय १९ वा.** |
| २१० | ८६चे पुढें | इति भारत वनपर्वणि ।<br>सकळ तीर्थांचिया श्रेणी ।<br>जोडती इये ग्रंथ—श्रवणीं ।<br>मुक्तेश्वर कवि वदे ॥८७॥ |
| | | **अध्याय २०.** |
| २१३ | ३१—३२ | यावरी बोले बिभीषण ।<br>स्वामी जालेती प्रसन्न ।<br>तरी जो वर मागेन ।<br>तो दीधला पाहिजे ॥१॥ |
| २१४ | ४७—४८ | तिहीं लोकांच्या सुंदरी ।<br>हिरोनी आणिल्या बळात्कारीं ।<br>दासी सूदल्या सहस्र घरीं । |

अनुक्रमणिका

| पृष्ठ | ओवी संख्या | अधिक ओव्या. |
| --- | --- | --- |
| | | जाति पाद्मिनी भोगावया ॥१॥ |
| | | **अध्याय २२.** |
| २४० | ४–९ | वक्ता वदे स्नेह–मेळी । |
| | | ब्राम्हण–वेष धरूनी हेली ॥ |
| | | उतरला असे भूमंडळीं । |
| | | हितोपदेशा कारणें ॥१॥ |

**समाप्त.**

अनुक्रमणिका

# उपसंहार.

ईश—कृपेनें आज दोन वर्षांत मुक्तेश्वरकृत वनपर्व आमचे हातून समग्र मुद्रित झालें. आरंभीं आमचे जवळ एकच पोथी होती. परंतु चार पांच अध्याय छापण्याकरितां तयार झाल्यावर आणखी तीन मिळाल्या. पैकीं दोहोंत मात्र हरिश्चंद्राख्यान आहे. बाकीच्यांत आठराच अध्याय आढळतात. मुक्तेश्वरानें हरिश्चंद्राख्यान प्रथम निराळें रचून नंतर तें आपणच वनपर्वांत सामील केलें असावें असें वाटतें. पहिल्या अध्याया खेरीज इतर कोणत्याही अध्यायाचे आरंभीं गणपति—स्तवन नसून फक्त तें साहवे अध्यायाचे मात्र आरंभीं आढळतें ही गोष्ट, वरील मतास पुष्टि आणिते. मूळ भारतांत हें हरिश्चंद्राख्यान नाहीं. सदर्हू प्रकरण ( हरिश्चंद्राख्यान ) मार्कंडेय पुराणांत आलीकडे आमचे आढळण्यांत आलें आहे. मुक्तेश्वरी हरिश्चंद्राख्यान व मार्कंडेय पुराणांतर्गत हरिश्चंद्राख्यान ह्यांत बरीच तफावत दृष्टीस पडते. मोरोपंतांनीं मात्र मार्कंडेय पुराणाप्रमाणें सर्व कथा दिली आहे. पंतांनीं सदर्हू पुराणांतील सप्तशति व मदालसाख्यान हीं दोन प्रकरणेंही आर्या-बद्ध रचिलीं आहेत. आतां मुक्तेश्वराविषयीं एक आख्यायिका सांगून लेखणी ठेवतों.

ग्रंथारंभीं एकनाथाची कन्या लीलाबाई ही विश्वंभरबावा यांस दिली होती असें सांगण्यांत आलेंच आहे. हे विश्वंभरबावा वारांगनानुरक्त असल्यामुळें ह्यांचा पाय घरीं ठरत नसे. त्यामुळें लीला बाईस संसारसुख मिळेनासें झालें. तेव्हां तिनें आपली स्थिति दीन मुद्रेनें पित्यास विदित केली. त्यावरून त्यांहीं जामाताकरवीं आपणास भोजनास बोलावण्याची योजना करण्यास सांगितलें. तदनुरूप विश्वंभरबावांनीं पत्नीचे सांगण्यावरून एकनाथ स्वामीस भोजनास बलाविलें. भोजन समयीं स्त्रीस तरणोपाय कोणता असें नाथांनीं विचारल्या वरून विश्वंभर बुवांनीं ' पती ' असें उत्तर दिलें. तदनंतर " तुम्हीं प्रत्यहीं रात्रौ भोजनोत्तर भगवद्गीतेचा एक अध्याय आपले पत्नीस सार्थ वाचून ऐकवावा व मग आपले इच्छेनुरूप नेहमी प्रमाणें वर्तावें " असें नाथांनीं जामातास सांगून ती गोष्ट त्यांजकडून कबूल करून घेतली. त्या प्रमाणें प्रथम दिवशीं प्रथमाध्याय सार्थ वाचून बुवा बाहेर गेले. दुसरे दिवशीं

" अशोच्यानन्वशोचस्त्वं प्रज्ञावादांश्च भाषसे " या स्थळीं येऊन ठेपल्यावर विषयाचा विचार करितां करितां रात्र निघून गेली. या प्रमाणें गीता पन्नीस ऐकविण्याचा नियम केल्यामुळें विश्वंभरबुवांचा बाहेर जाण्याचा नाद सुटला. नंतर यथाकाळीं मुक्तेश्वराचा जन्म झाला. पुढें सात आठ वर्षांचा पुत्र झाला तरी तोंडांतून शब्द काढीना, म्हणून लीलाबाई पित्याजवळ जाऊन करुणा भाकीत बसली. तेव्हां नाथांनीं दौहित्रास विचारिलें " मुला, तूं बोलत कां नाहींस? " तेव्हां मुलानें उत्तर दिलें कीं आपण 'मला बोण्यास कांहीं शिक्षक ठेविले नाहीं.' त्यावर नाथ म्हणाले " बाबा ! मी अजून भारतास हात लाविला नाहीं. तें तूं कर." अशी आज्ञा झाल्यावर सर्व भारत रचिलें. त्याचीं चवदा पर्वें नष्ट झाल्याची कथा मागें ग्रंथारंभीं दिली आहे. तथापि कांहीं पर्वें तरी अजून उपलब्ध व्हावीं असें आम्हांस वाटतें. ह्यास्तव सर्व शोधक पुरुषांनीं हे काम हातीं घ्यावें अशी त्यांस आमची सविनय प्रार्थना आहे.





अनुक्रमणिका

देती ऐश्वर्य भारी भुवनमहित मी या पदें कैटभारी ।
हे माझी कीर्ति सारी द्विजपदयुगळीं सर्व संताप सारी ॥ ३६ ॥
भवत्पादाब्जांचे दृढ वसति चित्तीं भरंवसे ।
बळें या घेऊनी अहिपति शिरीं भूभर वसे ॥
भवत्पादार्चेनें सकळ सुरवृंदा महित मीं ।
असे तापार्तांचा विधु तरणि उद्दाम हि तमीं ॥ ३७ ॥
भवद्वंदापाशीं मम मन बसे वेंचित रती ।
भवाब्धीतें सारे द्विजचरणसेवें चि तरती ॥
तुह्मीं स्वस्वाधीन क्षितिसुर[2] तपस्वी जग वितां[3] ।
त्या नेतां कांहीं समय कुतुकानें जगवितां ॥ ३८ ॥
तुम्हीं त्रैलोक्याचे अभयसुखदेते वसविते ।
अविद्याध्वांताचे सदुदित धरादेव सविते ॥
भवन्माहात्म्याला अवधिच नसे शोधक-मतें ।
असें जाणायाला पदनमन हें बोधक मतें ॥ ३९ ॥
ब्रह्मण्य देव हरि यापरि गोड बोले । प्रेमें करूनि धृतसात्विकभाव डोले ॥
हातें हळू चि रगडी पद देव दोनी । विप्रासि दुर्लभ असें सुख दे वदोनी ४०
करि करें मग साधु सभाजनें । स्तविति ज्या प्रति साधुसभाजन ॥
करुनियां चरितें हरि तो मला । बहु मला गमतो हरि तो भला ॥ ४१ ॥
केलें ब्रह्मण्य देवें अतुळ कुतुक हें तारक श्रेष्ठ आजी ।
आजा धूतो पदातें वर मुदितमनें घालिते नीर आजी ॥
नाहीं संकोच पूजा गुरु करि बहुधा टाकिली लाज नातें ।
हें गातां शीघ्र तारी परि बरि हरिची सत्वलीला जनातें ॥ ४२ ॥
सारे सात्विकभाव या वसुमतीदेवास झाले तसे ।
जे तद्भक्त तदीय देह चि तशा त्या भूषणा लेतसे ॥
तो श्रीकांतदयापयोद मुनि तो भासे मयूराभ[6] रे ।
नेमानें भरतें अनुक्षण तदा तद्बाष्पपूरा भरे ॥ ४३ ॥
वंदी तो भृगु सकळक्षमानदाते । दासांच्या सुरवरलक्षमानदातें ॥
गेला तो मुदित सरस्वतीस सत्रा । घेऊनी हरिगुणसद्व्रतीस सत्रा ॥ ४४ ॥
काथि भृगु हरिभक्तिमज्जनातें । करिति मुनी सुखसिंधु-मज्जनातें[7] ॥
विविजनिस हि देति खेंव सारे । म्हणति मुकुंद भजा सुखें वसा रे ॥४५॥

१ शेष. २ भूदेव (ब्राम्हण.) ३ उत्पन्न करिता. ४ पूजा. ५ पाप. ६ मयूराप्रमाणें शोभणार. ७ स्नानातें.

